अधीक्षक अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करण्याबाबत...
श्री. अ.खं.बोंदाडे, सेवानिवृत्त कार्यकारी अभियंता (स्थापत्य)

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन आदेश क्र. एसएलएस/पीओजी १२०५/प्र.क्र. २०७/२००५/आ.(वर्ग-१).**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२५.

<u>वाचा</u> :

१. शासन आदेश, पाटबंधारे विभाग, क्र. शिभंका२००१/५६३/(१३८)/दक्षता-१, दि.१९.०४.२००५.
२. शासन आदेश, जलसंपदा विभाग क्र.एसएलएस/पीओजी १२०५/(५९/२००५)/आ.(वर्ग-१), दि.१३.०५.२००५.
३. शासन आदेश, जलसंपदा विभाग क्र.एसएलएस/पीओजी १२०५/(२०७/२००५)/आ.(वर्ग-१), दि.२५.०५.२००५.
४. शासन आदेश, जलसंपदा विभाग, क्र. अपील २००५/(प्र.क्र.१०६/०५)/दक्षता-१, दि.०१.०४.२००८.
५. शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्र. अअज्ये २०१३/(५२६/२०१३)/आ(वर्ग-१) दि.२५.०२.२०१४.

**<u>प्रस्तावना</u> :-**

श्री.अ.खं.बोंदाडे, से.नि.कार्यकारी अभियंता (स्था) यांना अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गामध्ये संदर्भ क्र.२ येथील दि.१३.०५.२००५ च्या आदेशान्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली होती. तथापि, श्री.बोंदाडे यांना विभागीय चौकशीतून दोषमुक्त केलेल्या आदेशाचे पुनर्विलोकन करण्याचा निर्णय विभागाने घेऊन, त्यांच्या अधीक्षक अभियंता या पदावरील पदोन्नतीच्या नेमणूकीस स्थगिती देऊन त्यांना पूर्वीच्या कार्यकारी अभियंता या पदावर कार्यरत राहण्याचे आदेश दि.२५.०५.२००५ रोजी देण्यात आले. तद्नंतर श्री.बोंदाडे यांच्या विरुध्द असलेल्या विभागीय चौकशीचे पुनर्निरीक्षण करून त्यांना दि.०१.०४.२००८ च्या आदेशान्वये “ठपका” ठेवण्याची शिक्षा देण्यात आली. त्यानुषंगाने श्री.बोंदाडे यांना त्यांचे सेवाकनिष्ठ असलेल्या श्री.वि.रा.भुरे यांचा अधीक्षक अभियंता या पदावरील पदोन्नती नियमित केल्याचा दिनांक हा श्री.बोंदाडे यांना मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन आदेश :</u>**

अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या निवडसूचींचे पुनर्विलोकन करुन संदर्भाधीन क्र.५ येथील दि.२५.०२.२०१४ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठता यादीनुसार श्री.अ.खं. बोंदाडे, सेवानिवृत्त कार्यकारी अभियंता यांना सेवाकनिष्ठ असलेले श्री.वि.रा. भुरे यांना अधीक्षक अभियंता (स्थापत्य) पदाचा दिनांक १३.०५.२००५ हा ज्येष्ठतेचा दिनांक दर्शविण्यात आला आहे. त्यास अनुसरुन श्री.अ.खं.बोंदाडे, से.नि. कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना श्री.वि.रा.भुरे यांचा अधीक्षक अभियंता (स्था) पदावरील पदोन्नतीचा दि.१३.०५.२००५ हा मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१) श्री.बोंदाडे, सेवानिवृत्त कार्यकारी अभियंता यांना अधीक्षक अभियंता या पदोन्नतीच्या पदावर मंजूर करण्यात आलेला दि.१३.०५.२००५ हा मानीव दिनांक, ते कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील पदावरून अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या अनुषंगाने ते सदर पदावर प्रत्यक्ष रुजू झाल्याच्या दिनांकापर्यंत त्यांची काल्पनिक वेतननिश्चिती करण्यात यावी. तसेच दि.१३.०५.२००५ हा पदोन्नतीचा मानीव दिनांक ते श्री.बोंदाडे यांना अधीक्षक अभियंता (स्था) या पदावर देण्यात आलेया पदोन्नतीच्या अनुषंगाने, श्री.बोंदाडे सदर पदावर रुजू झाल्याच्या प्रत्यक्ष दिनांकापर्यंत या कालावधीतील काल्पनिक वेतननिश्चितीच्या अनुषंगाने वेतन व भत्त्यांची थकबाकी, श्री.बोंदाडे यांना अनुज्ञेय राहणार नाही.

२) सदर मानीव दिनांक मंजूरीस अनुसरून श्री.बोंदाडे यांच्या नावाचा समावेश निवडसूचीत करण्याबाबतची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येईल.

३) श्री.बोंदाडे यांना अधीक्षक अभियंता (स्था) पदावरील पदोन्नतीसाठी मंजूर करण्यात येत असलेल्या दि.१३.०५.२००५ या पदोन्नतीच्या मानीव दिनांकास महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता घेण्यात येईल.

**२.** सदर आदेश हे सामान्य प्रशासन विभागाने दि.१८.१०.२०२४ व वित्त विभागाने अनौ.संदर्भ क्र.३९२/२४/सेवा-३, दि.२३.१०.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**३.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०२२५१२०५५४४८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUHAS BAJIRAO JADHWAR

Digitally signed by SUHAS BAJIRAO JADHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=0de66b4d57847be117776aeaf9e53c5b70f1b8d7fdab972d3d1e2c6397e1faa5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F66717B05E42A313D9839BD11E491F5C5F850C51D1F3CB32930D359D7331FF36, cn=SUHAS BAJIRAO JADHWAR
Date: 2025.02.25 12:07:05 +05'30'

**( सुहास जाधवर )**
**अवर सचिव, जलसंपदा विभाग.**

प्रत:

१. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (लाक्षेवि) /सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
४. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई /नागपूर.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड
६. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का-१२), मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव (सेवा-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. श्रीमती मिनाक्षी अशोककुमार बोंदाडे (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांच्यामार्फत- त्यांना विनंती करण्यात येते की, कै.श्री.अ.खं.बोंदाडे, से.नि.कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद, बीड यांची प्रत त्यांच्या पत्नी यांना सुपूर्द करुन त्याची पोच शासनास सादर करावी.)
११. आ (वर्ग-१) कार्यासन संग्रहार्थ.